आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ करीता संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत.
(लेखाशिर्ष २२३५ सी १६१, २२३५ सी १७२)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१ / प्र.क्र. ६ / कार्यासन-६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :- ०१ नोव्हेंबर ,२०२१.**

**वाचा :-**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८ / अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग,समक्रमांक,दि.२२.०४.२०२१.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाची नस्ती क्र. विसयो-२०२१/प्र.क्र.४२/विसयो.

**प्रस्तावना :-**

कोविड-१९ महामारीच्या पार्श्वभूमीवर मा.मुख्यमंत्री महोदयांनी दि.१३.०४.२०२१ रोजी ब्रेक-द-चेन या कार्यक्रमांतर्गत दि.१५.०४.२०२१ ते दि.०१.०५.२०२१ या कालावधीसाठी राज्यात संचारबंदी लागू करण्यात आली होती. या काळात राज्यातील आर्थिक दुर्बल घटकांना दिलासा देण्याच्या दृष्टीने संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना या योजनांचे माहे एप्रिल व माहे मे या दोन महिन्यांचे अर्थसहाय्य लाभार्थ्यांना एप्रिल महिन्यामध्ये आगाऊ देण्याचे जाहीर केल्याने सन २०२१-२२ या वर्षात आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या संजय गांधी निराधार अनुदान योजनेसाठी रु.४५००.०० लाख व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेसाठी रु.९०००.०० लाख इतका निधी संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास वितरीत करण्यात आला आहे. आता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ अन्वये सादर करण्यात आलेल्या निधी वितरण प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण मधील संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना या योजनांकरीता संदर्भाधीन क्र. ३ येथील नस्तीवरील वित्त विभागाच्या मान्यतेस

अनुसरुन सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षाच्या ६० टक्के मर्यादेतील उपलब्ध तरतुदींतून पुढीलप्रमाणे उर्वरीत निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव व लेखाशिर्ष | बाब | सन -२०२१ २२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | ६० % मर्यादेत उपलब्ध तरतूद | यापुर्वी वितरीत तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | संजय गांधी निराधार अनुदान योजना (२२३५ सी १६१) | ५०, इतर खर्च | १००००.०० | ६०००.०० | ४५००.०० | १५००.०० |
| २ | श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना (२२३५ सी १७२) | | २१०००.०० | १२६००.०० | ९०००.०० | ३६००.०० |
| | | **एकूण** | **३१०००.००** | **१८६००.००** | **१३५००.००** | **५१००.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.५१००.०० लाख (अक्षरी रुपये एक्कावन्न कोटी फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ येथील शा.नि.अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.९१३/व्यय-१४, दि.१२.१०.२०२१ अन्वये उपलब्ध करून दिलेल्या मर्यादेत व मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२८११२१२१५२२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijesing Fattesing Vasave

Digitally signed by Vijesing Fattesing Vasave
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, serialNumber=2182f4f20daa6841ab430b2fd812e7b5d3a883e72efa574ca5e29ff528bc8015, cn=Vijesing Fattesing Vasave
Date: 2021.11.01 16:08:30 +05'30'

**( वि.फ.वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
८. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
१०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२. कार्यासन क्र.१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.